पोलीस हवालदार व पोलीस नाईक पदांचे सेवा प्रवेश नियम व त्यांच्या कर्तव्य व जबाबदा-या मंजूर करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक: पीएए ०३९६/सीआर-२९०/ पोल-५ (अ)
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक: ९ [illegible],२००१.

**वाचा:-**
१) शासन निर्णय गृह विभाग,क्रमांक पीएए ०३९१/सीआर-२७२/पोल-५(अ) दिनांक: ४.११.१९९२
२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे अ.शा.पत्र/५४/१९९६/कक्ष-२ (र. व का.शाखा) दिनांक ११.६.१९९६.

**शासन निर्णय:-** राज्य पोलीस दलामध्ये पदोन्नतीसाठी लागणारा विलंब दूर करुन पोलीस खात्याचे नितीधैर्य व कार्यक्षमता वाढविण्याच्या दृष्टीने शासनाने पोलीस शिपायांच्या मंजूर पदांपैकी १५००० पदे श्रेणीवाढ करुन पोलीस नाईक ही पदे रु. ९५०-२०-११५०-दक्षतारोध- २५-१५०० या वेतनश्रेणी मध्ये शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक: पीएए ०३९१/सीआर-२७२/पोल-५(अ) दि. ४.११.१९९२ अन्वये निर्माण करण्यात आली. पोलीस नाईक पदावरुन पोलीस हवालदार या पदावर पदोन्नती देण्यात येत असल्याने पोलीस नाईक व पोलीस हवालदार या पदांच्या कर्तव्य व जबाबदा-या निश्चित करणे तसेच त्याच्या सेवाप्रवेश नियमांस मंजूरी देणे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास शासनाने मान्यता दिली असून पोलीस नाईक व पोलीस हवालदार पदांची कर्तव्य व जबाबदा-या सोबतच्या सहपत्रामध्ये नमूद केल्याप्रमाणे विहित करण्यात येत आहेत. तसेच या पदांचे सेवा प्रवेश नियम स्वतंत्र अधिसूचनेद्वारे प्रसिध्द करण्यात येत आहेत.

हे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४०९/१२ दिनांक ४.२.२००० अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( दि. वा. दळवी )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

GR-20020415152510000-0200

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई.
महालेखापाल (लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन-१२
निवड नस्ती (पोल-५ अ)

)

**पोलीस हवालदार व पोलीस नाईक या पदाची कामे खालील प्रमाणे आहेत.**

| पोलीस हवालदार | पोलीस नाईक |
|---|---|
| पोलीस हवालदारांनी त्यांना वरिष्ठ असलेल्या पोलीस उपनिरीक्षकांच्या आणि पोलीस दलातील इतर वरिष्ठ अधिका-यांच्या आदेशाच्या आधीन राहून काम करणे आवश्यक आहे. त्यांच्या हाताखालील कर्मचारी त्यांच्या आज्ञाचे पालन करतात किंवा नाही हे पाहणे. | १) पोलीस हवालदार,पो.उ.नि. व त्यावरील दर्जाच्या तपास अधिका-यांना मदत करणे. |
| २. त्यांच्या क्षेत्रात घडणा-या सर्व गुन्हयांची माहिती देणे तसेच एखादा दखलपात्र गुन्हा घडण्याची शक्यता असेल तर अशा सर्व घटनांची माहिती वरिष्ठांना देणे, तसेच अशावेळी वरिष्ठांच्या आदेशाची वाट न पाहता तपास चालू करुन गुन्हेगारास शोधून अटक करणे. | २) पोलीस दलातील पडेल ते काम करणे व निरनिराळया बंदोबस्ताकरिता हजर राहणे |
| ३. गुन्हा घडू नये यासाठी प्रतिबंधात्मक कारवाई करतांना आणि सुव्यवस्था राखतांना वरिष्ठांनी दिलेल्या आदेशाचे पालन करणे. | ३) सार्वजनिक ठिकाणी निगराणीकरिता दिवसा किंवा रात्रीच्या गस्ती करिता डयुटी करणे, कैद्यांची ने-आण करणे. |
| ४. एखादया ठिकाणी आकस्मात किंवा संशयास्पद मृत्यू झाला असेल तर वरिष्ठांचे आदेश प्राप्त होईपर्यंत सदर प्रेताची विल्हेवाट लावण्यास प्रतिबंध करणे. | ४) पोलीस शिपायांच्या कामावर देखरेख करणे तसेच त्यांना वेळोवेळी मार्गदर्शन करणे. |
| ५. एखाद्या विशिष्ठ ठिकाणी किंवा गस्ती क्षेत्रात पोलीस हवालदाराने पोलीसांच्या कार्यक्षेत्रातील सर्व प्रकरणाबाबत गाव पोलीस प्रमुखाशी समन्वय साधून कृती करणे. | ५) गुन्हयाचा तपास व हवालदाराची इतर कर्तव्ये बजावणे. |
| ६. त्यांच्या हाताखालील पोलीस / ग्राम पोलीस करीत असलेला हजगर्जीपणा, आज्ञाभंग किंवा अयोग्य वर्तणूक तात्काळ वरिष्ठांच्या निदर्शनास आणणे तसेच एखाद्याची प्रशंसनीय कामगिरी वरिष्ठांच्या निदर्शनास आणणे.ही पोलीस हवालदारांची जबाबदारी राहील. | - |